<u>राष्ट्रीय एड्स नियंत्रण कार्यक्रम</u>
**महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्था, मुंबई- निधी वितरण (वित्तीय वर्ष २०१५-१६)**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः एनिका-२०१५/प्र.क्र.२६३/आ-५,

जी.टी.रुग्णालय आवार, कॉम्प्लेक्स बिल्डींग,
नवीन मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: १५ सप्टेंबर, २०१५.

<u>वाचा :</u>

१) **केंद्र शासनाच्या एड्स नियंत्रण विभागाचे निधी वितरणाचे आदेश क्र. T-११०१७/१/२०१५-१६/NACO (F), दि. २१ मे, २०१५ (दोन स्वतंत्र आदेश)**

२) **प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्था, मुंबई यांचे क्र.मराएनिसो/वित्त/२०१५-१६/१००५०, दि.२२/०५/२०१५ रोजीचे पत्र.**

३) **वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पूरक-२०१५/प्र.क्र.१४०/अर्थसंकल्प-३, दि. १ ऑगस्ट, २०१५.**

४) **आरोग्य आणि कुटुंब कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे राष्ट्रीय एड्स नियंत्रण संस्थेचे क्र.Z-१७०१८/४/२०१३-NACO (Fin), दि. ४ ऑगस्ट, २०१५ रोजीचे पत्र.**

<u>प्रस्तावना :</u>

राष्ट्रीय एड्स नियंत्रण कार्यक्रम हा १०० टक्के केंद्र पुरस्कृत कार्यक्रम आहे. राज्यात हा कार्यक्रम (बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्र वगळून) महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्था, मुंबई (MSACS) या शासकीय संस्थेमार्फत राबविला जातो. सन २०१५-१६ मध्ये राज्यात राष्ट्रीय एड्स नियंत्रण कार्यक्रम राबविण्यासाठी महाराष्ट्र राज्य एड्स संस्थेमार्फत रु.१४४.४४ कोटी इतक्या रकमेचा वार्षिक कृती आराखडा केंद्र शासनास सादर केला होता. सदर कृती आराखडयास मंजुरी देण्यास काही अवधी लागत असल्याने, निधी अभावी कार्यक्रम अंमलबजावणीत बाधा येऊ नये म्हणून केंद्र शासनाने वरील वाचा क्र.१ येथे नमुद आदेशान्वये महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्थेस रु.११८९.०२ लक्ष इतका निधी मंजुर केला आहे. राज्याच्या सन २०१५-१६ च्या मूळ अर्थसंकल्पात महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्थेच्या (२२१० एफ १४८-योजनांतर्गत) या लेखाशिर्षाखाली केवळ रु.१०००/- इतकी (टोकन) तरतूद करण्यात आल्याने अपूऱ्या तरतूदीमुळे केंद्र शासनाने वरील वाचा क्र.१ अन्वये महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्थेस मंजुर केलेला रु.११८९.०२ लक्ष इतका निधी वितरीत करता आला नाही. महाराष्ट्र विधानमंडळाच्या जुलै, २०१५ पावसाळी अधिवेशनात महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्थेच्या (२२१० एफ १४८-योजनांतर्गत) या लेखाशिर्षाखाली रु.१४४.४४ कोटी इतक्या रकमेचा पुरवणीचा प्रस्ताव सादर करण्यात आला होता. परंतु विधानमंडळाने रु.११९०.०२. लक्ष इतक्या रकमेची पुरवणी मागणी मंजुर केली आहे. सदर पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध करुन दिलेला रु.११९०.०२ लक्ष इतक्या निधीपैकी केंद्र शासनाने वरील वाचा क्र.१ येथे नमुद आदेशान्वये मंजुर केलेला रु.११८९.०२ लक्ष इतका निधी महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्थेस कार्यक्रम अंमलबजावणीसाठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सन २०१५-१६ या वित्तीय वर्षात राष्ट्रीय एड्स नियंत्रण कार्यक्रम या योजनांवरील खर्च भागविण्यासाठी तसेच या योजनेंतर्गत कार्यरत अधिकारी/कर्मचारी वर्गाचे वेतन व भत्ते यावरील खर्च भागविण्याकरीता महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्थेसाठी विधानमंडळाच्या जुलै, २०१५ (पावसाळी) अधिवेशनात रु.११,९०,०२,०००/- (अक्षरी रुपये अकरा कोटी नव्वद लक्ष दोन हजार फक्त) इतका निधी पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर उपलब्ध तरतुदीतून महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्थेसाठी रु. ११,८९,०२,०००/- (अक्षरी रुपये अकरा कोटी एकोणनव्वद लक्ष दोन हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे शासन मंजुरी देण्यात येत आहे.

सदरचा खर्च खाली दर्शविलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या वर्षासाठी मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्र. आर-१**
२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०६- सार्वजनिक आरोग्य
(१०१) रोग प्रतिबंध व नियंत्रण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना
०१- रोग प्रतिबंध व नियंत्रण
१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना
(०१)(५५) राष्ट्रीय एड्स नियंत्रण कार्यक्रम
(१०० टक्के केंद्रीय हिस्सा)
(२२१० एफ १४८)
३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

राष्ट्रीय एड्स नियंत्रण कार्यक्रमांतर्गत महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्थेस वितरीत केलेल्या निधीचा ताळमेळ राखण्यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई यांना व सदर अनुदानाशी संबंधीत देयके अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च करु नये व खर्चाचा ताळमेळ घालून अहवाल तसेच उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावे.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५१६/व्यय-१३, दि.१४.०९.२०१५ व अनौपचारिक संदर्भ क्र.१२८/अर्थोपाय, दि.११.०९.२०१४ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१५१४५९४६५२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jayshree Suresh Jadhav

Digitally signed by Jayshree Suresh Jadhav
DN: CN = Jayshree Suresh Jadhav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.09.16 12:48:54 +05'30'

**( ज. सु. जाधव )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्था, वडाळा, मुंबई.
२. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
३. सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, लेखा व कोषागारे, मुंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. नियोजन विभाग (का. १४७२), मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग, व्यय-१३/अर्थोपाय शाखा/ अर्थसंकल्प-९, मंत्रालय, मुंबई.
१०.सार्वजनिक आरोग्य विभाग, (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
११.सार्वजनिक आरोग्य विभाग (लेखा), मंत्रालय, मुंबई.
१२.निवडनस्ती (आ-५)